**<u>निर्मल ग्राम पुरस्कार योजना</u>**
अंमलबजावणी संदर्भात सुधारीत मार्गदर्शक सूचना.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

शासन निर्णय क्रमांक निर्मल-१००९/प्र.क्र.१३६/पापु-१६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- २ जून, २००९.

**वाचा:-** १) केंद्र शासनाचे अ.शा.पत्र क्र.डब्ल्यू-११०४५/७/2007-सीआरएसपी दिनांक १३ मे, २००९.

**प्रस्तावना:**

उघड्यावरील शौचविधीची पध्दत बंद होवून ग्रामीण परिसर स्वच्छ व सुंदर व्हावा यासाठी केंद्र शासनाने सन २००३ पासून निर्मल ग्राम पुरस्कार योजना जाहिर केलेली आहे. या योजनेंतर्गत हागंदारीमुक्त ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना मा. राष्ट्रपती महोदयांच्या हस्ते रोख पुरस्कार वितरीत करण्यात येतो. या योजनेंतर्गत बक्षीसासाठी पात्र ठरण्यासाठीचे निकष, प्रस्ताव पाठविणे व त्याच्या तपासणीची पध्दत, बक्षीस वितरण पध्दत, बक्षीसाचा विनियोग व ग्रामपंचायतींनी निर्मल ग्राम दर्जा टिकविणे यासारख्या बाबीबाबत केंद्र शासनाने सदर्भाधीन पत्रान्वये सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. या सुधारीत मार्गदर्शक सूचनानुसार निर्मल ग्राम पुरस्कार योजना राबविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

निर्मल ग्राम पुरस्कार योजनेचा हेतु केवळ बक्षीस मिळविणे हा नसून गावांच्या हागंदारीमुक्त स्थितीमुळे ग्रामीण भागातील रोगराई नाहिशी होवून ग्रामस्थांचे आरोग्यमान सुधारावे हा आहे. काही ग्रामपंचायती पूर्णपणे हागंदारीमुक्त होण्यापूर्वीच प्रस्ताव सादर करतात. तसेच, काही ग्रामपंचायती त्यांनी प्राप्त केलेला निर्मल ग्राम दर्जा टिकवून ठेवण्यात कमी पडत असल्याचे निदर्शनास आल्याने ग्रामपंचायतींना मिळालेला निर्मल ग्राम दर्जा ग्रामपंचायतीनी टिकवून ठेवण्यासाठी तसेच ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना मिळालेल्या पुरस्कार रकमेचा विनियोग कशा प्रकारे करावा याबाबत केंद्र शासनाने दिलेल्या सूचनानुसार कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. याबाबत खालीलप्रमाणे सुधारित मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

### १) निर्मल ग्राम पुरस्कार योजनेचे उद्देश:

निर्मल ग्राम पुरस्कार योजनेचे मुख्य उद्देश खालीलप्रमाणे आहेत.

१) ग्रामीण भागातील सामाजिक व राजकीय विकासाच्या चर्चेत स्वच्छत हा विषय अग्रभागी आणणे.
२) स्वच्छ व हागंदारीमुक्त अशी आदर्श गावे निर्माण करणे की ज्याच्यापासून इतरांना प्रेरणा मिळू शकेल.
३) स्वच्छतेची व्याप्ती वाढविण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांनी पुढाकार घेवून हागंदारीमुक्त केलेल्या आपल्या कार्यक्षेत्राची हागंदारीमुक्त स्थिती टिकवून ठेवण्यासाठी त्यांना प्रोत्साहन म्हणून पुरस्कार देणे.

४) स्वच्छतेची व्याप्ती वाढविण्यासाठी संस्थांनी केलेल्या प्रेरकाच्या कामाचे मोल जाणून संपूर्ण स्वच्छता अभियानाच्या अंमलबजावणीत सामाजिक जागृकता वाढविणे.

## २) निर्मल ग्राम पुरस्कारासाठी पात्रता निकष:

निर्मल ग्राम पुरस्कार दोन वर्गात देण्यात येत आहे.

**अ) पंचायत राज संस्था :-** यामध्ये ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदा निर्मल ग्राम पुरस्कारासाठी प्रस्ताव सादर करू शकतील. परंतु, **कोणत्याही पंचायत राज संस्थेस पुनर्तपासणीसाठीचा प्रस्ताव धरून तीन पेक्षा जास्त वेळा प्रस्ताव सादर करता येणार नाही.**

निर्मल ग्राम पुरस्काराकरीता खालीलप्रमाणे निकष आहेत.

१) पंचायत राज संस्थेमधील सर्व कुटुंबाना वैयक्तिक किंवा सामुहिक शौचालयाची सुविधा उपलब्ध असावी. तसेच कुटुंबातील सर्व सदस्यांनी या शौचालयाचा वापर करणे आवश्यक आहे.

२) जी कुटुंबे वैयक्तिक शौचालयाऐवजी सामुहिक शौचालयाचा वापर करीत असतील, त्या कुटुंबाकरीता, जास्तीत जास्त तीन कुटुंबासाठी एक शौचालय असावे. त्या शौचालयाच्या कुलपाची चावी प्रत्येक कुटुंबाकडे द्यावी. या शौचालयाची स्वच्छता व देखभाल करण्याची जबाबदारी, त्याचा वापर करणा-या कुटुंबांची राहील.

३) सर्व शासकीय, अनुदानित व विनाअनुदानित खाजगी शाळा व अंगणवाडीमध्ये वापरता येण्यासारखी स्वच्छ शौचालये व मुता-या असाव्यात. प्राथमिक शाळेपेक्षा वरच्या स्तरावरील सर्व शाळांमध्ये मुलांच्या व मुलींच्या संख्येनुसार आवश्यक तेवढी मुलांसाठी व मुलीसाठी वेगवेगळी शौचालये व मुता-या असणे आवश्यक आहे. यामध्ये २० ते ४० विद्यार्थ्यांसाठी एक मुतारी व ८० ते १२० विद्यार्थ्यांसाठी एक शौचालय असे प्रमाण असावे.

४) पंचायत राज संस्थेच्या हद्दीतील उघड्यावरील शौचविधीची पध्दत पूर्णपणे बंद केलेली असावी. तरंगत्या लोकसंख्येसह (Including floating population) कुणीही व्यक्ती उघड्यावर शौचविधी करत नसावा. तसेच लहान मुलांच्या मैल्याचीसुध्दा शौचालयातच विल्हेवाट लावावी.

५) प्रस्ताव सादर करणा-या ग्रामपंचायतीने तसेच पंचायत समिती व जिल्हा परिषदांच्या बाबतीत त्या पंचायत समितीच्या व जिल्हा परिषदांच्या कार्यक्षेत्रातील सर्व ग्रामपंचायतींनी ग्रामसभेमध्ये उघड्यावरील शौचविधीची पध्दत बंद करण्याचा ठराव करणे आवश्यक आहे. त्या ठरावामध्ये उघड्यावर शौचविधी करणा-यावर योग्य त्या दंडाची तसेच उघड्यावरील शौचविधीची पध्दत बंद करण्याच्या पध्दतीचे संनियंत्रण करण्याची तरतूद करणे आवश्यक आहे. या ठरावाची प्रत प्रस्तावासोबत जोडणे आवश्यक आहे.

६) सार्वजनिक नळ, हातपंप, विहिर यासारख्या पिण्याचे पाणी मिळण्याच्या सर्व ठिकाणाभोवती योग्य प्लॅटफॉर्म असावा व त्याच्याभोवती सांडपाणी वाहून जाण्यासाठी नाली/गटारे असावीत.

७) ग्रामपंचायतील जमा होणा-या घनकच-याचे योग्य विल्हेवाट लावण्याची व सांडपाण्याच्या योग्य व्यवस्थापनासाठी प्रभावी यंत्रणा कार्यरत असावी तसेच गावातील परिसर स्वच्छ असावा. ग्रामपंचायतीच्या हद्दीतील परिसरात कच-याचे ढीग किंवा सांडपाण्याची डबकी असू नयेत. गावातील उघड्यावरील शौचविधीची पध्दत बंद केल्यामुळे तसेच गावाचा स्वच्छतेचा दर्जा सुधारल्यामुळे ग्रामस्थांच्या आरोग्यात सुधारणा होईल. त्या गावातील

हागवणीच्या रोगाचे तसेच हागवणीमुळे होणा-या मृत्युचे प्रमाण कमी झाल्याचे संबंधित प्राथमिक आरोग्य केंद्राच्या आकडेवारीवरून समजू शकेल.

८) गावातील स्वच्छतेचा दर्जा टिकवून ठेवण्यासाठी गावाने विकसित केलेली नाविन्यपूर्ण पध्दती जसे, घनकच-याची योग्य विल्हेवाट, लहान मुलांच्या मैल्याची योग्य विल्हेवाट, वयस्कर, शारिरीकदृष्ट्या दुर्बल, अपंग यांच्यासाठी तयार केलेल्या सुविधा व त्याचा वापर इत्यादी बाबींना निर्मल ग्राम पुरस्कारासाठी निवड करतांना प्राधान्य (Weightage) देण्यात देण्यात येईल.

**ब) संस्था :** स्वयंसेवी संस्था, बचत गट यासारख्या संस्था, की ज्या संबंधित पंचायत राज संस्थेच्या कार्यक्षेत्रात संपूर्ण स्वच्छतेच्या कामासाठी आघाडीवर असतील अशा संस्थांचे नामनिर्देशन व शिफारस राज्य शासन करू शकेल व या संस्थांचा विचार निर्मल ग्राम पुरस्कारासाठी करण्यात येईल. स्वच्छतेच्या क्षेत्रात उत्कृष्ट योगदान देणा-या संस्थांचाच या पुरस्कारासाठी विचार करण्यात येईल. संस्थांच्या शिफारशीसाठी तसेच नामनिर्देशनासाठी खालीलप्रमाणे निकष आहेत.

१) सदर संस्थेचे कार्यक्षेत्र संपूर्ण तालुका किंवा जिल्हा असावा.
२) सदर पंचायत समितीस किंवा जिल्ह्यास निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेला असावा.
३) सदर पंचायत समितीतील किंवा जिल्ह्यातील किमान २५ टक्के ग्रामपंचायतींना निर्मल ग्राम पुरस्कार मिळवून देण्यात सदर संस्थेचे महत्वाचे योगदान असावे.
४) सदर पंचायत समितीस किंवा जिल्ह्यास निर्मल ग्राम पुरस्कार मिळणे आवश्यक राहील या अटीच्या अधीन राहून वयस्कर, शारिरीकदृष्ट्या दुर्बल, अपंग यासारख्या विविध गटातील व्यक्तींना सार्वजनिक शौचालयाचा वापर करता यावा यासाठी संस्थेने तयार केलेल्या सुविधा, पर्यावरणाच्या दृष्टीकोनातून योग्य अशी घनकचरा विल्हेवाटीची तयार केलेली पध्दत, घनकचरा व सांडपाणी यावर पुनर्प्रक्रीया व पुनर्वापर इत्यादी, किंवा दुर्गम भागातील तसेच आपत्कालीक विशेष परिस्थितीत महत्वाचे काम करणा-या संस्थांची राज्य शासन शिफारस करू शकेल.

**३) पुरस्कार रक्कम:**

या योजनेंतर्गत पंचायत राज संस्थांना देण्यात येणारी पुरस्कार रक्कम ही लोकसंख्येवर आधारीत देण्यात येत आहे. ती खालीलप्रमाणे आहे.

| पंचायत राज संस्था | ग्रामपंचायती | | | | | पंचायत समित्या | | जिल्हा | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सन २००१ च्या जनगणनेनुसार लोकसंख्या | १००० पेक्षा कमी | १००० ते १९९९ | २००० ते ४९९९ | ५००० ते ९९९९ | १०००० किंवा त्यापेक्षा जास्त | ५०००० पर्यंत | ५०००१ आणि त्यापेक्षा जास्त | १० लाखा पर्यंत | १० लाखा पेक्षा जास्त |
| पुरस्कार रक्कम (रु. लाखात) | ०.५० | १.०० | २.०० | ४.०० | ५.०० | १०.०० | २०.०० | ३०.०० | ५०.०० |

रोख पुरस्कार फक्त पंचायत राज संस्थांनाच देण्यात येतील. संस्थांना स्मृतिचिन्ह देवून त्यांच्या आसामान्य कार्याचा शासनाकडून खास गौरव करण्यात येईल.

**४) प्रस्ताव सादर करण्याची पध्दत:**

**अ) पंचायत राज संस्था:-** सोबतच्या विवरणपत्र-१ मध्ये दिलेल्या नमून्यात पंचायत राज संस्थानी प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे. प्रस्तावासोबत संबंधित ग्रामपंचायतीने रु. २०००/- अनामत रक्कम पंचायत समितीकडे जमा करावी. जर सदर ग्रामपंचायत राज्य स्तरावरील तपासणीत हागंदारीमुक्त आढळून आल्यास, त्या ग्रामपंचायतीची अनामत रक्कम परत करण्यात येईल. मात्र सदर ग्रामपंचायत राज्य स्तरावरील तपासणीत हागंदारीमुक्त आढळून न आल्यास, त्या ग्रामपंचायतीची अनामत रक्कम जप्त करण्यात येईल. प्रस्ताव प्राप्त ग्रामपंचायतींची तपासणी पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर करून हागंदारीमुक्त ग्रामपंचायतींची गट विकास अधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या शिफरशीसह प्रस्ताव राज्य शासनाकडे सादर करावा.

**ब) संस्था:-** निर्मल ग्राम पुरस्कारासाठी संस्थांची नावे जिल्हा परिषदा नामनिदेर्शित करू शकतील व जिल्हा परिषदांनी नामनिर्देशित केलेल्या संस्थांनी विवरणपत्र-२ मध्ये दिलेल्या नमून्यात प्रस्ताव सादर करावा.

**५) प्रस्ताव सादर करणे, तपासण्या व पुरस्कार वितरण समारंभ याचे वेळापत्रक:**

**अ) फक्त सन २००९ साठी:-**

१) दिनांक ३० जून २००९ पर्यंत पंचायत समिती व जिल्हा परिषदांच्या शिफारशीसह राज्य शासनाकडे प्रस्ताव प्राप्त होणे आवश्यक.
२) दिनांक १५ ऑगस्ट २००९ पर्यंत राज्य स्तरावरील तपासण्या पूर्ण करून केंद्र शासनाला वेबसाईटव्दारे प्रस्ताव सादर करणे.
३) दिनांक ३० ऑक्टोबर २००९ पर्यंत केंद्र शासनाकडून निर्मल ग्राम पुरस्काराची तात्पुरती यादी जाहीर करणे.

**ब) सन २०१० व त्यापासून पुढे:-**

१) दिनांक १५ फेब्रुवारी पर्यंत पंचायत समिती व जिल्हा परिषदांच्या शिफारशीसह राज्य शासनाकडे संबंधित वर्षातील प्रस्ताव प्राप्त होणे आवश्यक.
२) दिनांक १५ एप्रिल पर्यंत राज्य स्तरावरील तपासण्या पूर्ण करणे.
३) दिनांक १५ मे पर्यंत केंद्र शासनाला वेबसाईटव्दारे प्रस्ताव सादर करणे.
४) दिनांक १५ जून पर्यंत केंद्र शासनाकडून नमूना तपासणी (Sample verification) पूर्ण करण्यात येईल.
५) दिनांक १५ जूलै पर्यंत केंद्र शासनाकडून निर्मल ग्राम पुरस्काराची तात्पुरती यादी जाहीर करण्यात येईल.
६) दिनांक १५ ऑगस्ट पर्यंत पुनर्तपासणीसाठी केंद्र शासनाकडे विनंती अर्ज करता येईल. १५ ऑगस्ट नंतर प्राप्त झालेल्या पुनर्तपासणी अर्जाचा विचार केली जाणार नाही.
७) दिनांक १५ सप्टेंबर पर्यंत निर्मल ग्राम पुरस्काराची अंतिम यादी केंद्र शासनाकडून जाहीर करण्यात येईल.
८) प्रत्येक वर्षी नोव्हेंबर महिन्यात पुरस्कार वितरण समारंभ होईल.

**६) तपासणी पध्दत:**

संबंधित गट विकास अधिका-याच्या शिफारशीसह जिल्हा परिषदांकडे प्रस्ताव प्राप्त होणा-या ग्रामपंचायतींची तपासणी जिल्हा स्तरावर राज्य शासनाने संबंधित जिल्ह्यासाठी निवडलेल्या सहाय्यकारी साधन संस्था (KRC) कडून तपासणी करून घ्यावी. आवश्यकता असल्यास संबंधित जिल्हा परिषदेने प्रस्तावांची छाननी करण्यासाठी जिल्हा छाननी समिती (District Scrutiny Committees) नेमावी.

केंद्र शासनाने निवडलेल्या पॅनल मधील संस्थांकडून राज्यस्तरावरील तपासणी करून घेण्यात येईल. तपासणी केल्यानंतर, तपासणी करणा-या संस्थांनी आपला अहवाल राज्य शासनास सादर करावा. तपासणीसाठी संस्थांची निवड करतांना खालील निकषानुसार करण्यात येईल.

१) स्वच्छतेच्या क्षेत्रातील किंवा ग्रामीण विकासाच्या क्षेत्रातील ३ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त अनुभव असलेल्या स्वयंसेवी संस्था.
२) संशोधन करणा-या संस्था.
३) यापूर्वी निर्मल ग्राम पुरस्कार प्राप्त झालेली ग्रामपंचायत किंवा पंचायत समिती आणि जिल्हा स्तरावरील अधिकारी मिळून तयार केलेली तपासणी समिती.
४) राज्य शासनाच्या ग्रामीण विकास विभागाकडून किंवा संवाद व क्षमता विकास कक्षाकडून किंवा सहाय्यकारी साधन संस्थांनी (KRC) प्रशिक्षण देवून तयार केलेल्या संस्था.

तपासणीसाठी निवडलेल्या कोणत्याही संस्थेला, दुस-या संस्थेकडून तपासणी (Sub-contracting) करून घेता येणार नाही. कोणतीही संस्था दुस-या संस्थेकडून तपासणी (Sub-contracting) करून घेत असल्याचे आढळल्यास संबंधित संस्थेस पॅनलमधून काढून टाकण्यात येईल.

सर्व संस्थांनी विहीत नमून्यातच अर्ज सादर करणे व तपासणीच्या सर्व स्तरावर केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे आवश्यक आहे.

**७) राज्यस्तरावरील पडताळणी:**

तपासणी समित्याकडून तपासणी अहवाल प्राप्त झाल्यानंतर, सदर तपासणी अहवाल व संबंधित पंचायत राज संस्थांचे प्रस्ताव यांची पडताळणी करण्यासाठी राज्य स्तरावर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

१) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय - अध्यक्ष
२) संचालक, सुधारणा, सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RSPMU) - सदस्य
३) राज्य प्रकल्प संचालक, सर्व शिक्षा अभियान - सदस्य
४) संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन (NRHM) - सदस्य
५) महासंचालक, आरोग्य संचालनालय - सदस्य
६) राज्य शासनाने नियुक्त केलेला एक स्वच्छता तज्ज्ञ - सदस्य
७) स्वच्छतेच्या क्षेत्रातील १० वर्षापेक्षा जास्त अनुभव असलेल्या नामांकित स्वयंसेवी संस्थेचा एक प्रतिनिधी - सदस्य
८) राज्यसमन्वयक, संवाद व क्षमता विकास कक्ष - सदस्य सचिव

प्राप्त झालेले प्रस्ताव, तपासणी अहवाल व त्यासंबंधित इतर माहिती याच्या आधारे राज्य पडताळणी समितीने पडताळणी करून निर्मल ग्राम पुरस्कारासाठी पात्र वाटणा-या पंचायत राज संस्थांची शिफारस केंद्र शासनाकडे करावी व सदर प्रस्ताव केंद्र शासनास वेबसाईटव्दारे पाठवावा. तसेच सदर प्रस्तावावर प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांची सही घेवून मूळ प्रस्ताव केंद्र शासनास पाठवावा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांच्याखेरीज इतरांची सही असलेले प्रस्ताव केंद्र शासन स्वीकारणार नाही.

केंद्र शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावापैकी ३०% पंचायत राज संस्थांची तपासणी, केंद्र शासनाने यासाठी निवडलेल्या तपासणी संस्थांकडून केली जाईल. राज्य शासनाकडून शिफारशी प्राप्त झाल्या तरी, निवडीबाबत केंद्र शासनाच्या निर्मल ग्राम पुरस्कार निवड समितीचा निर्णय अंतिम असेल.

निर्मल ग्राम पुरस्कारासाठी पंचायत समितीचा प्रस्ताव प्राप्त झाल्यास, त्या पंचायत समितीतील यापूर्वी निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेल्या ग्रामपंचायतीसह एकूण ग्रामपंचायतीपैकी २५% ग्रामपंचायतींची तपासणी केंद्र शासन करणार आहे.

निर्मल ग्राम पुरस्कार हा प्रतिष्ठित पुरस्कार असल्याने या पुरस्काराची प्रतिष्ठा कमी होवू नये यासाठी, केंद्र शासनाने तपासलेल्या व पडताळणी केलेल्या ग्रामपंचायतीपैकी १०% ग्रामपंचायती अपात्र आढळल्यास, संबंधित राज्यातील उर्वरित सर्व ग्रामपंचायतींची तपासणी केंद्र शासन करेल. अशा तपासणीत पात्र व अपात्र आढळलेल्या ग्रामपंचायतीसह सर्व ग्रामपंचायतींच्या तपासणीचा सर्व खर्च राज्यास वितरीत करण्यात येणा-या निधीतून केंद्र शासन वसुल करेल. तसेच तपासणीसाठी निवडलेल्या संस्थांनी शिफारस केलेल्या पंचायत राज संस्थापैकी १०% किंवा त्यापेक्षा जास्त पंचायत राज संस्था अपात्र आढळल्यास संबंधित तपासणी संस्थेस पॅनलमधून काढून टाकण्यात येईल.

**८) निर्मल ग्राम पुरस्कारासाठी पंचायत समित्या, जिल्हा व संस्थांच्या निवडीची पध्दत:**

संबंधित वर्षातील या पुरस्कारासाठी राज्य शासनाच्या पडताळणी समितीने पडताळणी करून शिफारस केलेल्या पंचायत समित्या, जिल्हे व संस्था यांचे प्रस्ताव केंद्र शासन विचारात घेईल. ग्रामपंचायतींच्या प्रस्तावासाठी दिलेले उपरोक्त वेळापत्रकच या प्रस्तावांसाठी सुध्दा लागू असेल. निर्मल ग्राम पुरस्कारासाठी पंचायत समितीचा/जिल्ह्यांचा प्रस्ताव प्राप्त झाल्यास, त्या पंचायत समितीतील/जिल्ह्यातील यापूर्वी निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेल्या ग्रामपंचायतीसह एकूण ग्रामपंचायतीपैकी २५% ग्रामपंचायतींची तपासणी करून केंद्र शासन या पुरस्कारासाठी पंचायत समित्यांची/जिल्ह्यांची निवड करेल.

प्रस्ताव प्राप्त संस्थांच्या कामाची तपासणी केंद्र शासन योग्य रीतीने करेल.

राज्य शासनाने शिफारस केलेले प्रस्ताव अंतिम निवडीसाठी राष्ट्रीय निर्मल ग्राम पुरस्कार निवड समिती (National NGP Selection Committee(s)) समोर ठेवण्यात येईल. सदर समिती खालीलप्रमाणे असेल.

१) केंद्र शासनाने नामनिर्देशित केलेला सहसचिव किंवा समकक्ष दर्जाचा अधिकारी.
२) संबंधित राज्यातील स्वच्छता विषय हाताळणारे सचिव किंवा त्यांचा प्रतिनिधी.
३) स्वच्छतेच्या क्षेत्रातील १० वर्षापेक्षा जास्त अनुभव असणा-या दोन व्यक्ती किंवा संस्था.

## ९) पुरस्काराची रक्कम वितरीत करण्याची पध्दत:

केंद्र शासनाने निर्मल ग्राम पुरस्कार जाहीर केलेल्या पंचायत राज संस्थांच्या पुरस्काराची रक्कम, निर्मल ग्राम पुरस्कारासाठी राज्य शासनाने उघडलेल्या बँक खात्यात केंद्र शासनाकडून पाठविण्यात येईल. राज्य शासन सदर पुरस्काराची रक्कम जिल्हा परिषदेमार्फत संबंधित पंचायत राज संस्थांना वितरीत करेल. निर्मल ग्राम पुरस्काराची रक्कम वितरीत करण्यासाठी केंद्र शासनाच्या सूचनेनुसार खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) केंद्र शासनाने निर्मल ग्राम पुरस्कार जाहिर केलेल्या ग्रामपंचायतीपैकी रु. ५० हजार पुरस्कार मिळालेल्या ग्रामपंचायतींना त्वरीत पुरस्काराची रक्कम वितरीत करण्यात येईल.

२) पुरस्काराची रक्कम रु. १ लाख किंवा त्यापेक्षा जास्त असेल तर, ती दोन हप्त्यात देण्यात येईल. यापैकी पहिला हप्ता म्हणून पुरस्कार रकमेपैकी ५०% रक्कम त्वरीत देण्यात येईल.

३) उर्वरित ५० टक्के रक्कम सहा महिन्यानंतर ग्रामपंचायतींची यादृच्छिक तपासणी (Random checks) करून, ग्रामपंचायतीने हागंदारीमुक्त दर्जा व गावाची निर्मल ग्राम स्थिती टिकविली असेल तर देण्यात यावी. सदर ग्रामपंचायतीने हागंदारीमुक्त दर्जा व गावाची निर्मल ग्राम स्थिती टिकविली नसेल तर अशा ग्रामपंचायतीविरुध्द खालीलप्रमाणे कारवाई करावी.

अ) पुरस्काराच्या दुस-या हप्त्याची रक्कम जप्त करावी.

ब) ग्रामपंचायतीचा निर्मल ग्राम दर्जा जाहिररीत्या काढून घ्यावा.

क) या ग्रामपंचायतीचा निर्मल ग्राम दर्जा काढून घेतल्याबाबत स्थानिक वर्तमानपत्रात जाहिर करावे.

ड) सदर ग्रामपंचायतीला दिलेल्या पहिल्या हप्त्याची रक्कम ग्रामपंचायतीकडून वसूल करावी.

## १०) निर्मल ग्राम पुरस्कार रकमेचा विनियोग :

केंद्र पुरस्कृत निर्मल ग्राम पुरस्कार योजनेंतर्गत ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना मिळालेल्या निर्मल ग्राम पुरस्कार रकमेचा विनियोग आपल्या कार्यक्षेत्रातील स्वच्छतेच्या सोयी सुविधा टिकविण्यासाठी व त्यात सुधारणा करण्यासाठी करण्यात यावा. यासाठी खाली नमूद केलेल्या बाबींसाठी खर्च करता येईल.

**अ) ग्रामपंचायतीं :**

१) बाजाराची ठिकाणे, प्राथमिक आरोग्य केंद्रे, दवाखाने, यासारख्या ठिकाणी सामुदायिक स्वच्छतागृहे बांधण्यासाठी.

२) संपूर्ण स्वच्छता अभियानाच्या मंजूर प्रकल्पाच्या १०% निधी घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनासाठी खर्च अनुज्ञेय आहे. घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनासाठी यापेक्षा जास्त रकमेची आवश्यकता असेल तर या बक्षीस रकमेतून खर्च करता येईल.

३) राज्य शासनाच्या व जिल्हा परिषदेच्या मान्यतेने घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनासाठी जमीन खरेदी करण्यासाठी.

४) स्वच्छतेच्या सुविधांच्या देशभालीसाठी तसेच गावाचा हागंदारीमुक्त दर्जा टिकविण्यासाठी खर्च करता येईल.

५) पिण्याच्या पाणी पुरवठ्यासाठी तसेच पाऊसपाणी संकलन योजेसाठी (Rain Water Harvesting).
६) गांडुळखत प्रकल्पास चालना देण्यासाठी.
७) Eco-san ला चालना देण्यासाठी.
८) जेष्ठ व अपंग नागरीकांसाठी शौचालयाची सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी.
९) वैयक्तिक किंवा समुहाची शौचालये बायोगॅसला जोडण्यास चालना देण्यासाठी.
१०) बायोगॅस, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनाच्या नाविन्यपूर्ण योजनांसाठी.
११) अनुसुचित जाती व अनुसूचित जमाती साठी वैयक्तिक शौचालयाची सुविधा पुरविण्यासाठी.

**ब) पंचायत समित्या व जिल्हा परिषदा:**

१) स्वच्छता कार्यक्रमाचे संनियंत्रण करणारी यंत्रणा तयार करणे.
२) गावाची स्वच्छता राखण्यासाठी व गावाचा हागंदारीमुक्त दर्जा टिकवून ठेवण्यासाठी तसेच सार्वजनिक शौचालयाचा वापर करणा-यांकडून आवश्यक ते शुल्क वसूल करण्यासाठी या बक्षीस रकमेतून खर्च करता येईल. परंतु, पद निर्मिती किंवा वेतनाचे दायीत्व निर्माण करणा-या कोणत्याही बाबीवर या बक्षीस रकमेच्या निधीतून खर्च करता येणार नाही.

निर्मल ग्राम पुरस्कार न मिळालेल्या गावातील लोकांना स्वच्छतेबाबत प्रशिक्षण देण्यासाठी निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेल्या काही गांवात प्रशिक्षण केंद्रे तयार करून ती चालविण्यासाठी या पुरस्कार रकमेतून खर्च करता येईल.

**११) निर्मल ग्राम पुरस्काराच्या रक्कमेतून खालील बाबीवर खर्च करता येणार नाही :**

१) कार्यशाळा व सेमिनारच्या आयोजनासाठी.
२) यात्रा/जत्रा याच्या आयोजनासाठी.
३) विविध क्रीडा प्रकाराच्या/खेळाच्या आयोजनासाठी.
४) वाहन, मोबाईल, संगणक किंवा फर्निचर खरेदी करण्यासाठी.

**१२) पुरस्कार रकमेचे हिशोब ठेवणे :**

पंचायत राज संस्थांनी त्याना मिळालेल्या पुरस्कार रकमेचे व त्यातून केलेल्या खर्चाचे, प्रमाणकासह योग्य हिशोब ठेवणे आवश्यक आहे. पुरस्काराची रक्कम खर्च झाल्यानंतर ग्रामपंचायतींनी सदर पुरस्कार रकमेतून झालेल्या खर्चाचे उपयोगीता प्रमाणपत्र जिल्हा परिषदेस सादर करावे. जिल्हा परिषदांनी आपल्या जिल्ह्याचे एकत्रित उपयोगीता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर करावे. या पुरस्कार रकमेवर व्याज मिळालेले असल्यास सदर व्याजाच्या रक्कमेचा विनियोग पुरस्काराच्या रकमेप्रमाणेच करावा.

**१३) हागंदारीमुक्त दर्जा टिकविणे :**

१) निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेल्या ग्रामपंचायती, गांव हागंदारीमुक्त आहे हे दर्शविणारा चनिर्मल ग्रामछ चा फलक गावात लावण्यासाठी हक्कदार असतील. ग्रामपंचायतीने आपला हागंदारीमुक्त दर्जा टिकविला नसल्याचे आढळून आल्यास गावाचा हा हक्क काढून घेण्यात येईल.

२) ग्रामपंचायतीने आपला हागंदारीमुक्त दर्जा टिकविला नसल्याचे आढळून आल्यास सदर ग्रामपंचायतीस पुरस्काराच्या दुस-या हप्त्याची रक्कम देण्यात येणार नाही तसेच पहिल्या हप्त्याची दिलेली रक्कम ग्रामपंचायतीकडून वसूल करण्यात येईल.

३) पहिल्या व दुस-या हप्त्याची रक्कम दिल्यानंतरसुध्दा ग्रामपंचायतीने आपला हागंदारीमुक्त दर्जा टिकविला आहे किंवा नाही याची तपासणी जिल्हा परिषदेने यादृच्छिक पध्दतीने तपासणी (Random checks) करावी.

४) जलजन्य रोग (Waterborne diseases), पिण्याच्या पाण्यातील जैविक घटक (Bacteriological content) यावरून स्वच्छतेची व्याप्ती टिकून असल्याचे दिसून येवू शकेल.

५) निर्मल ग्राम पुरस्कार मिळाल्यानंतर सदर ग्रामपंचायतीमध्ये कधीही उघड्यावरील शौचविधी आढळून आल्यास त्या ग्रामपंचायतीचा निर्मल ग्राम दर्जा जाहीररीत्या काढून घेण्यात येईल.

**१४) अपिल :**

निर्मल ग्राम पुरस्कारासाठी निवड, तपासणीची पध्दत तसेच यासंबंधीच्या अन्य बाबीसंबंधी राष्ट्रीय निर्मल ग्राम पुरस्कार निवड समिती (National NGP Selection Committee) अंतिम प्राधिकारी राहील. तसेच या समितीकडे, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनामधील कोणताही भाग अधिकृमित करण्याचा किंवा त्यामध्ये बदल करण्याचा अधिकार असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०६०३१२१४०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अजितकुमार जैन)
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
४) सर्व मा. मंत्री महोदयांचे खाजगी सचिव
५) सर्व मा. राज्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव
६) सर्व संसद सदस्य.
७) विधानसभा व विधान परिषदेचे सर्व सदस्य.
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय.
९) विभागीय आयुक्त, सर्व.
१०) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सर्व.
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व. यांना विनंती की त्यांनी सदर आदेश सर्व ग्रामपंचायतींच्या निदर्शनास आणावेत.

१२) उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद, सर्व.
१३) राज्य समन्वयक, संवाद व क्षमता विकास कक्ष, बेलापूर.
१४) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व सर्व कार्यासने.
१७) निवड नस्ती, पापु-१६.

# APPLICATION FORM FOR NIRMAL GRAM PURASKAR
**(For Panchayati Raj Institutions)**

1. Category of PRI

| GP | BP | ZP |
|---|---|---|
| | | |

2. State ……………………………………………
3. District ……………………………………………
4. Block ……………………………………………

(Mention only if the application is from a Block/ Tehsil / Mandal or Gram Panchayat)

5. Gram Panchayat ……………………………………………

(Mention only if the application is from a Gram Panchayat)

6. Population of the applicant PRI …………………………………………
7. Complete Postal address of the PRI ……………………………………………

……………………………………………

………………………… Pin Code:

8. Household details at the time of conducting Baseline Survey -

8.1 Date/Period of Baseline Survey Conducted in GP/BP/ZP ………………………

8.2 Status during the Baseline Survey –

| No. of Households | Population | BPL Household | | APL Household | |
|---|---|---|---|---|---|
| | | With Toilet | Wothout Toilet | With Toilet | Wothout Toilet |
| | | | | | |

8.3 Date of achieving NGP status by fulfilling eligibility criteria. …………………
(Should achieve by 31/03/2009)

8.4 Status of coverage of households as on 31/03/2009 –

| No. of Household | Population | BPL Household | | APL Household | | No of households using Community Toilet | No of usable toilet seats available in these community Toilets |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | With Toilet | Wothout Toilet | With Toilet | Wothout Toilet | | |
| | | | | | | | |

8.5 Status of coverage of Anganwadi as on 31/03/2009-

| Anganwadi Name | No. Of Children in Anganwadi | No. Of Toilet seats available | No. Of Urinal spaces available |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

8.6 Status of coverage of Schools as on 31/03/2009 –

| School Name | School Category* | School Type# | Total Students@ | | | Total urinal Seats available | | | Total Toilet Seats Available | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | Total | Boys | Girls | Total | Boys | Girls | Total | Boys | Girls |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |

* School Category: Primary/Upper Primary/High School/Higher Secondary

\# School Type: Boys/Girls/Co-educational

@ Only in case of Coeducational Upper Primary/High school/higher Secondary schools Boys and Girls columns needs to be filled. Other wise in addition to Total only Boys/Girls column needs to be filled.

8.7 Number of diarrhea cases in the last 3 years?(Data to be taken from ANM/PHU/PHC records)

| Year | 2006 | 2007 | 2008 |
|---|---|---|---|
| No of diarrhea cases | | | |

9 Whether the eligibility conditions have been met?

9.1 Whether the PRI area is free from Open Defecation? Yes / No

9.2 Whether all members of all households in the PRI are using Toilets? Yes /No

9.3 Whether households using Community Toilets have at least one Latrine seat per three Households? Yes / No

9.4 Whether all Schools and Anganwadi in the PRI have Toilets? Yes / No

9.5 Whether all schools and Anganwadi have Toilet seats and Urinal spaces in proportion to the number of boys/girls separately? Yes / No

9.6 Is there functional mechanism for garbage disposal and drainage system? Yes /No

9.7 Do all drinking water sources have proper platforms and drainages around them? Yes / No

## CERTIFICATION

This is to certify that all members of all households in the PRI are using toilets. This is to further certify that the practice of open defecation has been fully eliminated in our PRI area.

This is to also certify that all schools in our PRI are having adequate and functional toilets and urinals facility, which are being used by children. There are separate toilet blocks for boys and girls in all CO-EDUCATIONAL Upper Primary/High school/Higher secondary schools in the PRI. All the toilets are properly maintained and students are educated about hygiene and sanitation aspects.

In view of this, we request that our PRI should be awarded Nirmal Gram Puraskar. We also undertake to utilize the award money for further improving sanitation facilities in our PRI.

| | |
|---|---|
| **Chairman, PRI**<br>(Name, Signature and Date) | **Member Secretary, PRI**<br>(Name, Signature and Date) |

**Application Verified and Recommended by**

| | |
|---|---|
| **1) Executive Officer, Block Panchayat**<br>(Name, Signature and Date with official seal) | **2) Chief Executive Officer, Zilla Panchayat**<br>(Name, Signature and Date with official seal) |

---

# Resolution

**We the members of ________Gram Sabha of**

**Village : ______________________________**

**Gram Panchayat : ______________________________**

**Block : ______________________________**

**District : ______________________________**

**Hereby resolve that in order to safeguard the health, dignity, privacy and security of women children, aged and all people in our village, no one should defecate in the open. Child faeces should be disposed of in toilets alone.**

**We the members of the Gram Sabha resolve that a administrative fee/penalty of __________________________ be imposed on anyone infringing this resolution by defecating in the open or disposing of child faeces in the open. We also resolve to set up the following system of monitoring to prevent open defecation.**

_________________________________________________________________

_________________________________________________________________

_________________________________________________________________

_________________________________________________________________

_________________________________________________________________

**In each cell the Signature of President/Members with his/her full name to be given.**

| | | |
|---|---|---|
| **1** | **2** | **3** |
| **4** | **5** | **6** |
| **7** | **8** | **9** |
| **10** | **11** | **12** |
| **13** | **14** | **15** |

**STATE CHECK LIST FOR NIRMAL GRAM PURASKAR**
(For Panchayat Raj Institutions)
To be filled in by State Government

| | | | |
|---|---|---|---|
| 1. Category of PRI | | | |

2. Gram Panchayat ………………………………………………………
(In case of GP application)

3. Block ………………….…………………………………….
(In case of BP/GP application)

4. District …………………………..………………………

5. State ……………………………..…………………….

6. Whether the PRI is free from open defecation? Yes/No

7. Whether all households in the PRI are using toilets? Yes/No

8. Whether the households using community toilet have at least one latrine seat per three households? Yes/No

9 Whether all households and Anganwadis in the PRIs have functional toilets? Yes/No

10. Whether separate Toilet Block provided for girls in all schools? Yes/No

11. Whether all schools and Anganwadis have toilet seats and urinal spaces and in proportion to the numbers of boys and girls separately? Yes/No

12. Is there a functional mechanism of garbage disposal and drainage system? Yes/No

13. Whether clean environment is maintained in the PRI area? Yes/No

14. Do all drinking water sources have proper platform and drainages around them? Yes/No

15. Whether ZP has recommended the award? Yes/No

16. Whether the State Selection committee has recommended the PRI for NGP? Yes/No

This is to certify that the application of ------------------------------------------------- PRI has been checked and verified with all due diligence, on the basis of which the PRI is found to fulfill the NGP eligibility conditions and is therefore recommended for award of Nirmal Gram Puraskar.

**Signature**
**Secretary to the State Government**

(Only signature of Secretary will be accepted. Cases signed by other officers, or signed on behalf of Secretary will not be considered)
(Hardcopies of only applications which are duly recommended for consideration may please be sent to DDWS)

# APPLICATION FORM FOR NIRMAL GRAM PURASKAR
(**For Organizations**)

1. Name of Applicant Organization ……..………………………………..
2. Complete Postal address ……..………………………………
…...…………………………………
………………………………………

3. Name of Contact person ………………………………………
Phone No (with STD Code) ………………………………………
Email Id ………………………………………

4. Area of work ………………………………………
(PRI Level of Applicant in Sanitation Program i.e Whether BP/ZP)

5. Whether the BP/ZP has been awarded NGP or has become
eligible in current year? Yes/No

6. The role played by Applicant ………………………………………
(a brief description)
…………………………………………………………………………………..
…………………………………………………………………………………..
…………………………………………………………………………………..

7. Whether applicant has worked for (more than one may be ticked)

| Sl No | Item | | | Details of each may be provided below |
|---|---|---|---|---|
| (i) | Program Management | Yes ☐ | No ☐ | |
| (ii) | IEC | Yes ☐ | No ☐ | |
| (iii) | RSM/PC | Yes ☐ | No ☐ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (iv) | Training | Yes ☐ | No ☐ | |
| (v) | School sanitation & Hygiene education | Yes ☐ | No ☐ | |
| (vi) | As Motivator | Yes ☐ | No ☐ | |
| (vii) | Innovations promoted by the organization<br>(a) Disabled friendly toilets | Yes ☐ | No ☐ | |
| | (b) Environment friendly garbage disposal and reuse/recycling | Yes ☐ | No ☐ | |
| | (c) Reuse or recycling wastewater | Yes ☐ | No ☐ | |
| | (d) Sanitation work in disaster situation | Yes ☐ | No ☐ | |
| | (e) Sanitation work in difficult area | Yes ☐ | No ☐ | |
| (viii) | Innovative methods to Universalize Sanitation<br>(i) Sanitary pad production | Yes ☐ | No ☐ | |
| | (ii) Safe disposal of sanitary pad | Yes ☐ | No ☐ | |
| | (iii) Sanitation for aged, Infant, physically challenged | Yes ☐ | No ☐ | |

8. What are the quantifiable results of the efforts of the applicant? (Please mention briefly)

..........................................................................................................................

..........................................................................................................................

..........................................................................................................................

**CERTIFICATION**

This is to certify that all the information furnished by me is true and I have not presented any wrong or distorted information. If at any point of time the information furnished by me is found to be wrong, I will forfeit my claim for Nirmal Gram Puraskar.

I request the Government of India to consider me for award of NGP.

Name: Yours faithfully

Designation:

Date: (Signature of Applicant)

## Recommendation by EO, BP

I have verified the claims of the organization as given above and certify that they are true on the basis of the verification.

**Executive Officer, Block Panchayat**
(Name and Signature with official seal) Date:

## Recommendation by CEO, ZP

I have got verified the claims of the organization as given above and on the basis of the verification, I recommend the application of the organization for the NGP award.

**Recommended by Chief Executive Officer, Zilla Panchayat**
(Name and Signature with official seal) Date:

**CHECK LIST FOR NIRMAL GRAM PURASKAR**
(For Organizations)

**RECOMMENDATION BY STATE GOVERNMENT**

1. Name of Applicant Organization ……………………………………

2. Address of Applicant ……………………………………

……………………………………

……………………………………

……………………………………

3. Name of Contact person ……………………………………

Phone No (with STD code) ……………………………………

Email Id ……………………………………

4. PRI where Applicant organization has worked (BP/ZP) ……………………………………

Name of PRI ……………………………………

Block ……………………………………

District ……………………………………

State ……………………………………

Population of the PRI ……………………………………

5. Whether the organization mentioned above is eligible for NGP? Yes ☐ No ☐

**Recommendation of State Government**

The State Government recommends the organization mentioned above for NGP award.

**Signature**
**Secretary to the State Government**